मुंबई जिल्हा महिला कारागृहासाठी पदे मंजूर करणे.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक आरसीटी २००४/प्र.क्र.५२/पीआरएस-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:-१७ नोव्हेंबर, २००४**

वाचा:- गृह विभाग अधिसूचना क्र.ओएनपी-२००३/प्र.क्र.१९४/१०५०/पीआरएस-२, दि.१.१०.२००३.

**<u>शासन निर्णय:-</u>**

शासन गृह विभाग अधिसूचना क्र.ओएनपी/२००३/प्र.क्र.१९४/१०५०/पीआरएस-२, दि.१.१०.२००३ अन्वये भायखळा जिल्हा कारागृह येथे महिला बंद्यांसाठी कायमस्वरुपी मुंबई जिल्हा महिला कारागृह सुरु केले आहे. या कारागृहातील महिला बंद्यांची दिवसेंदिवस वाढत जाणारी संख्या विचारात घेता व बंद्यावर नियंत्रणी ठेवण्याचे काम अत्यंत अपु-या असणा-या महिला कर्मचा-यांना कठीण होत होते. पुरुष कर्मचा-यांना महिला कारागृहात प्रवेश करण्यास मनाई असल्याने महिला बंद्यावरील नियंत्रणाकरीता पुरुष कर्मचा-यांचाही वापर करता येत नव्हता. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन मुंबई जिल्हा महिला कारागृहासाठी आणखी पदे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

भायखळा येथील मुंबई जिल्हा महिला कारागृहातील महिला बंद्यांची वाढती संख्या, अपुरा मंजूर कर्मचारी वर्ग, महिला कारागृहात पुरुषांना प्रवेश निषिद्ध व महिला कारागृहाच्या संदर्भात मा.उच्च न्यायालय येथे दाखल झालेली जनहितार्थ याचिका या बाबी विचारात घेऊन मुंबई जिल्हा महिला कारागृहासाठी २३ पदे मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव उच्च स्तरीय सचिव समितीकडे सादर केला असता समितीने प्रस्ताव मंजूर केला आहे.

उच्च स्तरीय सचिव समितीने मुंबई जिल्हा महिला कारागृहासाठी विविध संवर्गातील २३ पदे भरण्यास मान्यता दिलेली आहे. उच्च स्तरीय सचिव समितीच्या मान्यतेस अनुलक्षून खाली नमूद केलेली पदे भरण्यास शासन या शासन निर्णयान्वये मंजुरी देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | अधीक्षक | १ | ७४५०-२२५-११०५० |
| २ | तुरुंग अधिकारी श्रेणी-१ | १ | ६५००--२००-१०५०० |
| ३ | तुरुंग अधिकारी श्रेणी-२ | २ | ५५००-१७५-९००० |
| ४ | सुभेदार | १ | ४५००-१२५-७००० |
| ५ | हवालदार | २ | ४०००-१००-६००० |
| ६ | रक्षक | १० | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |

33/D:\pramilajpai-Fnav-1\letter\4

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | वरिष्ठ लिपिक | १ | ४०००-१००-६००० |
| ८ | लिपिक | २ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| ९ | वैद्यकिय अधिकारी | १ | ६५००-२००-१०५०० |
| १० | मिश्रक | १ | ४५००-१२५-७००० |
| ११ | शिक्षक | १ | ४०००-१००-६००० |
| | एकूण | २३ पदे | |

मुंबई जिल्हा महिला कारागृहासाठी वर नमूद केलेल्या २३ पदांच्या वेतन व भत्ते यावरील नोव्हेंबर, २००४ ते डिसेंबर, २००५ पर्यंतच्या कालावधीचा खर्च भागविण्यासाठी रु.२,९४,०००/- (रुपये दोन लाख चौ-याण्णव हजार फक्त) इतक्या खर्चास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

या प्रस्तावावरील खर्च शासन ज्ञापन वित्त विभाग क्र.आकनि/१००४/९४/अर्थसंकल्प -१० /दिनांक १६.११.२००४ संगणक संकेतांक क्रमांक (८०००-०९४-५)अन्वये मंजूर करण्यात आलेल्या रु.२,९४,०००/- (रुपये दोन लाख चौ-याण्णव हजार फक्त) इतक्या आकस्मिकता निधी अग्रीम रकमेमधून भागविण्यात यावा. या रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकांवर वर नमूद केलेल्या वित्त विभागाच्या शासन ज्ञापन अन्वये आकस्मिकता निधीमधून अग्रीम मंजूर असे लाल शाईने लिहावे. या रकमेची प्रतिपूर्ती करण्यासाठी आवश्यक ती पूरक मागणी विधी मंडळाच्या सन २००४ च्या आगामी अधिवेशनात शासनाकडून सादर करण्यात येईल.

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (खंड) (१) १९८७ मधील परिच्छेद ९८९ ते १९३ मध्ये नमूद करण्यात आलेल्या पध्दतीचा अवलंब करुन आकस्मिकता निधीच्या अग्रीम रकमेतून होणा-या खर्चाची विवरणपत्रे योग्य त्या प्रपत्रात दरमहा वेळच्यावेळी शासनास सादर करण्यात यावीत. सदर विवरणपत्रामध्ये आकस्मिकता निधी अग्रीमातून खर्च कोणत्या तारखेला करण्यात आला याचा तपशील देण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७९४/२००४/व्यय-८ दिनांक २०.१०.२००४ अन्वये यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( आ. ग. परदेशी )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई.

अधीक्षक, मुंबई जिल्हा महिला कारागृह भायखळा, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवास लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सहसंचालक लेखा व कोषागारेसंगणक कक्ष ,नवीन प्रशासन भवन,५ वा मजला मंत्रालयासमोर,मुंबई (दोन प्रती )
अवर सचिव (कार्यासन बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
वित्त विभाग, व्यय-८/वित्तीय सुधारणा-१/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१०,
निवड नस्ती, पीआरएस-१.

******